आदेश क्र. १

रोख रकमेत देय अनुदान

मागास क्षेत्र अनुदान निधी, (बीआरजीएफ) या १००% केंद्र पुरस्कृत योजनेतंर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ जिल्हा आराखडयासाठी मंजूर विकास निधीचा प्रथम हप्ता अनुदान वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीआरजीएफ-२०१४/प्र.क्र.२८/पंरा-६
बांधकाम भवन इमारत, २५, मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०१ ऑक्टोबर, २०१४

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः बीआरजीएफ-२००९/प्र.क्र.८५/पंरा-६ दि.१५ जानेवारी, २०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः बीआरजीएफ-२०१४/प्र.क्र.८५/पंरा-६ दि.२१ एप्रिल,२०१४.

प्रस्तावना -

मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) ही १००% केंद्र पुरस्कृत अनुदानाची योजना सन २००७-०८ पासून पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांचेमार्फत सुरू करण्यात आली आहे. राज्यामध्ये या योजनेच्या अंमलबजावणीकरीता केंद्र शासनामार्फत राज्यातील १२ जिल्हयांची निवड करण्यात आली आहे. त्यांची नावे पुढीलप्रमाणे १) अहमदनगर २) अमरावती ३) औरंगाबाद ४) भंडारा ५) चंद्रपूर ६) धुळे ७) गडचिरोली ८) गोंदिया ९) हिंगोली १०) नांदेड ११) नंदूरबार १२) यवतमाळ.मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) या योजनेचा मुख्य उद्देश प्रादेशिक असमतोल दूर करणे व स्थानिक पायाभूत सुविधामधील कच्चे दुवे जोडणे हा आहे. तसेच योजनेच्या माध्यमातून पंचायत व नगरपालिका स्तरावरील स्थानिक प्रशासनास बळकटी देण्यासाठी वेगवेगळया सुविधा उपलब्ध करणे व याद्वारे या संस्थाची क्षमताबांधणी करणे हा आहे.केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या या योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार जिल्हयाचा विकास दृष्टीकोन (Vision Document) विचारात घेऊन लोकसहभागातून गावआराखडा तयार करुन त्या गावआराखडयांचे पंचायत समितीद्वारे एकत्रीकरण केले जाते व जिल्हा

स्तरावर ग्रामीण व नागरी विभागाचा एकत्रित जिल्हा आराखडा तयार करण्यात येतो. तद्नंतर जिल्हा आराखडयास जिल्हा स्तरावर नियोजन समितीची (DPC) मंजुरी घेऊन सदर आराखडे केंद्र शासनास सादर केले जातात. तसेच राज्य स्तरावर उच्चाधिकार समितीच्या अवलोकनार्थ सादर करण्यात येतात. केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीतून वरील १२ जिल्हयात मंजूर आराखडयानुसार जिल्हा विकासाची कामे हाती घेण्यात येतात.

**शासन निर्णय -**

१. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात मागास क्षेत्र अनुदान निधी या योजनेच्या अमंलबजावणीसाठी रु.३९५.७२ कोटी (रु.तीनशे पंच्च्यान्नव कोटी बहात्तर लक्ष फक्त) एवढा निधी राज्यातील अर्थसंकल्पात प्रतिबिंबीत तरतूद म्हणून मंजूर करण्यात आला आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी केंद्र शासनाकडून रु.३१०.९३ कोटी (रुपये तीनशे दहा कोटी त्र्यान्नव लक्ष फक्त) एवढा निधी राज्यासाठी मंजूर केला आहे.

२. सन २०१४-१५ या चालु आर्थिक वर्षात अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ जिल्हयांसाठी प्रथम हप्त्याचा रु. १२४.३६ कोटी (रुपये एकशे चोवीस कोटी छत्तीस लक्ष फक्त) निधी केंद्र शासनाकडून राज्यास प्राप्त झाला असून, सदरचा निधी या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत आहे.

३. परिच्छेद २ मध्ये नमुद केल्याप्रमाणे सन २०१४-१५ या चालु आर्थिक वर्षात अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ जिल्हयासाठी प्रथम हप्त्याचा प्राप्त झालेल्या रु .१२४.३६ कोटी (रुपये एकशे चोवीस कोटी छत्तीस लक्ष फक्त), या निधीमध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी (STSP) रु .१९.१९ कोटी (रुपये एकोणीस कोटी एकोणऐंशी लक्ष फक्त) अनुसूचित जातीसाठी - (SCPSC), रु .१५.२० कोटी (रुपये पंधरा कोटी वीस लक्ष फक्त) तर सर्वसाधारणसाठ (NON SCPSC/STSP) रु .८९.३७ कोटी (रुपये एकोणनव्वद कोटी सोळा सदतीस लक्ष फक्त) एवढया निधीचा समावेश आहे .

४. मागास क्षेत्र अनुदान निधी या योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार केंद्र शासनाने संबंधित जिल्हयासाठी मंजूर केलेल्या एकुण निधीपैकी ५% एवढा निधी जिल्हा परीषद/पंचायत समिती / ग्राम पंचायत स्तरावरील प्रकल्प व्यवस्थापनाचा खर्च भागविण्यासाठी, तसेच १०% निधी हा कार्यसिध्दी प्रोत्साहन अंतर्गत पात्र ग्रामपंचायतींच्या विकास कामासाठी वापरायचा आहे आणि उर्वरित ८५% एवढा निधी जिल्हा आराखडयामध्ये मंजूर केल्यानुसार ग्रामीण व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या विकास कामांवर खर्च करावयाचा आहे.

५. मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या रु.१२४.३६ कोटी (रुपये एकशे चोवीस कोटी छत्तीस लक्ष फक्त) निधीपैकी या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या विवरणपत्रातील रकाना ११ मध्ये दर्शविल्यानुसार ५% प्रमाणे रु. ६.२२ कोटी (रुपये एक सहा कोटी बावीस लक्ष फक्त) एवढा निधी प्रकल्प व्यवस्थापनाचा खर्च भागविण्यासाठी, रकाना क्रमांक १२ मध्ये दर्शविल्यानुसार १०% प्रमाणे १२.४४ कोटी (रुपये बारा कोटी चव्वेचाळीस लक्ष फक्त) कार्यसिध्दी प्रोत्साहन अंतर्गत पात्र ग्रामपंचायतींच्या विकास कामांसाठी व रकाना १३ मध्ये दर्शविल्यानुसार उर्वरित ८५% प्रमाणे रू. १०५.७१ कोटी (रुपये एकशे पाच कोटी एक्कात्तर लक्ष फक्त) प्रस्तावित सर्व ग्रामपंचायतींच्या विकास कामांसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ यांच्या ट्रेझरी कोड क्रमांकावर अर्थसंकल्पीय प्रणालीद्वारे हा निधी या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे.

६. जिल्हा आराखडयामध्ये प्रस्तावित केलेल्या प्रमाणात ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थाचा निधी हा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचे अधिनस्त ठेवण्यात यावा व ते या निधीच्या बाबतीत नियंत्रक अधिकारी राहतील. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निधीच्या बाबतीत संबंधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी राहतील. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी

समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना त्यांचे अधिनस्त नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचा निधी वितरीत करावा. हा निधी मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार व शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या आराखडयातील योजनांवर / कामांवर खर्च करण्याची जबाबदारी उपरोक्त दोन्ही नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी. या संबंधीची सर्वस्वी जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी व जिल्हाधिकारी यांची राहील.

७. उपरोक्त निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांना प्राप्त झाल्यापासून कोणत्याही परिस्थितीत १५ दिवसाच्या आत संबधित अंमलबजावणी यंत्रणेस (ग्रामपंचायत/महानगरपालिका/नगरपरिषद) वितरीत करण्याविषयी पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांच्या स्पष्ट सूचना आहेत. त्या अनुषंगाने संबधित नियंत्रक अधिकारी यांनी विहीत मुदतीत अंमलबजावणी यंत्रणेस निधी वितरण करण्याची दक्षता घ्यावी. तथापि सध्या विधानसभा निवडणुकीचा कालावधी असल्याने, दिनांक १५ ऑक्टोबर, २०१४ नंतर म्हणजेच मतदान दिनानंतर जिल्हा स्तरावरुन ग्रामपंचायतींना निधी वितरित करण्यात यावा.

८. नियंत्रक अधिका-यांनी झालेल्या/होणा-या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयाच्या नोंदीशी ताळमेळ घेवून प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयात नोंद झालेला खर्च यामध्ये तफावत राहणार नाही याबाबत दक्षता घ्यावी आणि खर्चाच्या ताळमेळाचा दर तिमाही अहवाल विहीत मुदतीत सादर करावा. खर्चाचा अहवाल सादर करतांना खर्च केलेल्या अनुदानाच्या उपयोगिता प्रमाणपत्रसह सादर करावे व त्याची एक प्रत शासनास पाठवावी. शासन स्तरावरुन वितरित केलेल्या संपूर्ण निधीचे १००% उपयोगिता प्रमाणपत्र पाठविण्यात यावे. याशिवाय या योजनेच्या मासिक खर्चाच्या अहवालात चालु वर्षाचे उद्दिष्ट व पूर्ण केलेले साध्य इत्यादी बाबी नमुद

करुन मासिक प्रगती अहवाल दरमहा १० तारखेपूर्वी शासनास पाठवावा. तसेच कामांची प्रगती दरमहा ActionSoft या संगणक प्रणालीवर अद्ययावत करण्यात यावी.

९. सदरहू खर्च "मागणी क्रमांक - एल - ३, प्रधानशीर्ष - २५१५ - इतर ग्रामिण विकास कार्यक्रम, १०२ - सामुहिक विकास, केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०१) राष्ट्रीय समविकास योजना-मागास भागासाठी अनुदान योजना (योजनांतर्गत/दत्तमत) ३१ - सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदी मधून भागविण्यात यावा.

१०. सदर निधी वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५०६/अर्थ-१७ दिनांक २०.०९.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने वितरित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२०११०१०४५९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gite Naresh Bhagwanrao

Digitally signed by Gite Naresh Bhagwanrao
DN: CN = Gite Naresh Bhagwanrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.10.04 16:24:58 +05'30'

**डॉ.नरेश गिते**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त .नागपूर ,नाशिक ,अमरावती ,
२. जिल्हाधिकारी, अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ.
४. जिल्हा नियोजन अधिकारी, अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ.
५. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ.
७. जिल्हा परिषदांचे वित्त व लेखा अधिकारी, अहमदनगर, अमरावती, चंद्रपूर, धुळे आणि यवतमाळ.
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), मुंबई.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्ष), नागपूर .
१२. संचालक लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
१३. महालेखापाल, (लेखापरीखा व लेखा अनुज्ञेयत), महाराष्ट्र-१, मुंबई-१
१४. मुख्य लेखा परीक्षण (स्थानिक निधी लेखा) कोकण भवन, नवी मुंबई.
१५. वित्त विभाग, अर्थसंकल्प-१७/ व्यय-१५/ अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई.
१६. नियोजन विभाग,कार्यासन १४१४, १४४४, मंत्रालय, मुंबई.
१७. कार्यासन क्रमांक वित्त-१/वित्त-७/योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण,मंत्रालय,मुंबई.
१८. कार्यासन पंरा,०६- ग्राम विकास व जलसंधारण विभाग ,बांधकाम भवन इमारत ,२५ मर्झबान पथ, मुंबई.००१ ४००-

शासन निर्णय क्रमांक बीआरजीएफ- २०१४/ प्र.क्र-२८ / पंरा-६, दि. ०१ ऑक्टोबर, २०१४ (अनुदान आदेश क्र. १) (रुपयात)

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) योजनेसाठी वितरीत करावयाच्या निधीबाबत.

| अ. क्र. | जिल्हयांचे नाव | सन २०१४-१५ ची वार्षिक तरतूद | | | एकूण तरतूद (३+४+५) | सन २०१४-१५ साठी प्रथम हप्त्याचा निधी | | | केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला एकूण निधी (७+८+९) | व्यवस्थापन खर्चासाठी वितरीत करावयाचा ५% निधी (रकाना १० च्या ५% प्रमाणे) | कार्यसिध्दी प्रोत्साहनांतर्गत पात्र ग्रामपंचायतींना वापरावयाचा एकूण १०% निधी (रकाना १० च्या १०% प्रमाणे | BRGF योजनेतंर्गत विकास कामांसाठी वापरावयाचा एकूण ८५% निधी (रकाना १० च्या ८५% प्रमाणे | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा एकूण निधी (१३+१२+११) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अनु.जमाती | अनु.जाती | सर्वसाधारण | | अनु.जमाती (stsp) | अनु.जाती (scpsc) | सर्वसाधारण (Non-scpsc /stsp( | | | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
| १ | अहमदनगर | २-/९०,००,०००, | -/४,६३,००,००० | -/३१,०९,००,००० | -/३८,६२,००,००० | -/२,४३,००,००० | -/३,८८,००,००० | -/२६,०२,००,००० | -/३२,३३,००,००० | १,६१,६५-/०००, | ३,२३,३-/०,००० | २७,४८,०५-/०००, | -/३२,३३,००,००० |
| २ | अमरावती | -/४,०९,००,००० | -/५,१२,००,००० | -/२०,६९,००,००० | -/२९,९०,००,००० | -/३,५२,००,००० | -/४,४०,००,००० | -/१७,७९,००,००० | -/२५,७१,००,००० | १,२८,५५-/०००, | २,५७,१-/०,००० | २१,८५,३५-/०००, | -/२५,७१,००,००० |
| ३ | चंद्रपूर | -/४,९९,००,००० | -/३,९५,००,००० | -/१८,६०,००,००० | -/२७,५४,००,००० | -/३,८२,००,००० | -/३,०२,००,००० | -/१४,२५,००,००० | -/२१,०९,००,००० | १,०५,४५-/०००, | २,१०,९-/०,००० | १७,९२,६५-/०००, | -/२१,०९,००,००० |
| ४ | धुळे | -/५,९०,००,००० | -/१,४५,००,००० | -/१५,३५,००,००० | -/२२,७०,००,००० | -/५,०४,००,००० | -/१,२४,००,००० | -/१३,११,००,००० | -/१९,३९,००,००० | ९६,९५-/०००, | १,९३,९-/०,००० | १६,४८,१५-/०००, | -/१९,३९,००,००० |
| ५ | यवतमाळ | -/५,९२,००,००० | -/३,१६,००,००० | -/२१,६५,००,००० | -/३०,७३,००,००० | -/४,९८,००,००० | -/२,६६,००,००० | -/१८,२०,००,००० | -/२५,८४,००,००० | १,२९,२-/०,००० | २,५८,४-/०,००० | २१,९६,४-/०,००० | -/२५,८४,००,००० |
| **एकूण** | | **-/२३,८०,००,०००** | **-/१८,३१,००,०००** | **-/१,०७,३८,००,०००** | **-/१,४९,४९,००,०००** | **-/१९,७९,००,०००** | **-/१५,२०,००,०००** | **-/८९,३७,००,०००** | **-/१,२४,३६,००,०००** | **६,२१,८०-/०००,** | **१२,४३,६०-/०००,** | **१,०५,७०,६-/०,०००** | **-/१,२४,३६,००,०००** |

Gite Naresh Bhagwanrao

Digitally signed by Gite Naresh Bhagwanrao
DN: CN = Gite Naresh Bhagwanrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.10.04 16:29:27 +05'30'

**डॉ.नरेश गिते**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**